**सेवेत असताना कामास आलेल्या तसेच संघर्षात अथवा सेवेत असताना अपंग झालेल्या संरक्षण सेवेतील व्यक्तीच्या कुटुंबियास शासकीय सेवेत नियुक्तीस सवलत.**

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : आरटीए-१०८८/१७४/सीआर-२५/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २२ एप्रिल, १९८८.

<u>वाचा</u> :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक:एसपीएन-१०७५/१०३/१६, दिनांक १० नोव्हेंबर १९७६.
शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: आरटीए-१०८२/३५०२/सीआर-१००/१६-अ, दिनांक २ सप्टेंबर १९८३.

<u>शासन निर्णय</u> :- पाकिस्तान बरोबरच्या युध्दसंघर्षात कामास आलेल्या अथवा अपंग झालेल्या संरक्षण सेवेतील व्यक्तीच्या कुटुंबातील एका व्यक्तीस शासन सेवेतील वर्ग-३ व ४ च्या पदावर अग्रक्रमाने नोकरी देण्याबाबत आदेश शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसपीएन-२०७४/४०८७७/व्ही, दिनांक ७ जानेवारी, १९७२ मध्ये देण्यात आले होते. त्यानंतर शासन सेवेत वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदावर माजी सैनिक/अपंग सैनिकांना नियुक्तीसाठी १५ टक्के जागा आरक्षित करण्याबाबत तसेच अपंग सैनिकासाठी वयोमर्यादा ४५ वर्षापर्यंत शिथिल करण्याबाबत आदेश, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.आरटीए-१०७३/पाच, दिनांक ८ मे, १९७३ मध्ये देण्यात आले. संघर्षात अपंग झालेले सैनिक व मृत झालेल्या सैनिकांच्या कुटुंबातील एका व्यक्तीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या वर्ग ३ च्या पदासाठी घेण्यात येणाऱ्या स्पर्धा परीक्षेस ३ वर्षे वयोमर्यादा शिथिल करण्याबाबत आदेश शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसपीएन-१०७३/५०८७०/पाच, दिनांक २८ सप्टेंबर १९७३ नुसार देण्यात आले. युध्दात कामास आलेल्या अथवा अपंग झालेल्या व्यक्तीच्या कुटुंबियांना सेवेत नेमणुकीसाठी असलेल्या सवलती सर्व संघर्षात अथवा सेवेत असताना कामास आलेल्या/अपंग झालेल्या सैन्यातील व्यक्तीच्या कुटुंबियासाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसपीएन-१०७५/१०३/१६, दिनांक १० नोव्हेंबर १९७६ नुसार लागू करण्यात आल्या. तसेच शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. आरटीए-१०८२/३५०२/सीआर-१००/१६-अ, दिनांक २ सप्टेंबर १९८३ नुसार असे आदेश देण्यात आले की, माजी सैनिकासाठी आरक्षित असलेल्या १५ टक्के पदावर भरती करताना युध्द काळात किंवा युध्दात नसताना सैन्यातील सेवेमुळे अपंग झालेल्या माजी सैनिकांना प्राधान्य क्रमाने नियुक्त करावे व युध्द काळात किंवा युध्द नसताना सैनिकी सेवेत मृत झालेल्या किंवा अपंगत्व येवून त्यामुळे नोकरीसाठी अयोग्य झालेल्या माजी सैनिकाच्या कुटुंबातील एका व्यक्तीस त्यानंतरच्या पसंतीक्रमाने नियुक्त करावे.

वरील परिच्छेदात दर्शविलेल्या सर्व सवलती अलीकडेच श्रीलंकेत पाठविलेल्या भारतीय शांतता रक्षक दलातील सदस्यांनाही लागू करण्यात असे शासन आदेश देत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

र. शं. दिक्षित,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

कृ.मा.प.

शा.म.मु. रोटा/एच-११५[४०००-४-८८]

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
महालेखापाल, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई,
उप महालेखापाल, भविष्य निर्वाह निधी कक्ष, मुंबई,
महालेखापाल, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-२, नागपूर,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
संचालक, सेवायोजन कार्यालय, मुंबई,
मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
शिक्षण व सेवायोजन विभाग,
ग्राम विकास विभाग,
इतर सर्व मंत्रालयीन विभाग,
संचालक, सेवापूर्व प्रशिक्षण संस्था, सिडको कॉलनी, नवीन औरंगाबाद-४३१ ००३,
सचिव, महाराष्ट्र राज्य सैनिक मंडळ, पुणे,
सचिव, सर्व जिल्हा सैनिक मंडळे [द्वारा संबंधित जिल्हाधिकारी],
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक १२, १३-अ, १४-अ, १९, २८,
* सचिव, भारतीय सैनिक, नाविक, वायुसेना मंडळ, नवी दिल्ली,
* महासंचालक, पुनर्वसन, भारत सरकार, संरक्षण मंत्रालय, मौलाना आझाद रोड, नवी दिल्ली-११,
* सचिव, भारत सरकार, गृह मंत्रालय, सेवा प्रशासकीय सुधार विभाग, नवी दिल्ली,
व्यवस्थापकीय संचालक, सर्व महामंडळे/मंडळे व राज्य शासनाच्या अधिपत्याखालील संस्थांचे प्रशासकीय अधिकारी.

---

* पत्राने.

**********